"महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम" राज्यामध्ये राबविण्याबाबत ..

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक तंमुगां: १००९/सीआर-३६/२००९/पोल-१५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- २९ जुलै, २००९

वाचा:-१) शासन निर्णय क्रमांक तंमुगां: १००८/सीआर-४३/२००८/पोल-१५, दि:- १४ ऑगस्ट, २००८.

**शासन निर्णय -** संदर्भाधिन दिनांक १४ ऑगस्ट, २००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १५ अन्वये प्रसिद्धीसाठी पुरस्कार विहित करण्यात आला असून सदर शासन निर्णयातील परिशिष्ट -८ मध्ये वृत्तपत्रांच्या बातमीदारांना जिल्हा, विभाग व राज्यस्तरावर, प्रत्येक स्तरावर तीन पुरस्कार देण्याकरिता बातमीदारांची निवड करण्यासाठी जिल्हास्तर समिती, विभागीयस्तर समिती व राज्यस्तर समितीच्या रचना आणि बातमीदारांनी केलेल्या प्रसिद्धीच्या मूल्यमापनाचे निकष व देण्यात येणारे गुण याबाबत तरतुदी विहित करण्यात आल्या आहेत. परिशिष्ट -८ मध्ये निवड समित्यांची रचना देण्यात आली असून (क) राज्यस्तर समितीच्या रचनेमधील अनुक्रमांक १०. येथे "राज्यातील मराठी, हिंदी व इंग्रजी वृत्तपत्राचे प्रत्येकी एक संपादक - ३ सदस्य " अशी तरतूद आहे.

तथापि, वृत्तपत्रांच्यासंपादकांना कार्यबाहुल्यामुळे पुरेसा वेळ देणे शक्य होत नसते. महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेअंतर्गत जिल्हा, विभाग व राज्यस्तर यावर प्रत्येकी ३ याप्रमाणे १२० पुरस्कार प्रदान करण्यात येतात. राज्यस्तरावर थेट प्राप्त होणाऱ्या प्रवेशिका व विभाग स्तरावरील प्रथम निवडलेल्या उमेदवारांचे साहित्याचे परीक्षण करण्यात येते. या पुरस्काराचे स्वरुप विचारात घेता साहित्य परीक्षणासाठी पुरेसा वेळ संबंधितांकडून मिळणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने, वृत्तपत्रांच्या संपादकांबरोबरच वरीष्ठ पत्रकार यांची उपलब्धतेनुसार राज्यस्तरीय समितीवर नियुक्ती करणे उचित होईल व अशा सदस्यांकडून पुरेसा वेळ मिळू शकल्याने साहित्य परीक्षणास न्याय देता येईल. या भूमिकेतून दिनांक १४ ऑगस्ट, २००८ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-८ मधील (क) राज्यस्तरीय समिती या संदर्भातील अनुक्रमांक १० मधील "राज्यातील मराठी, हिंदी व इंग्रजी वृत्तपत्राचे प्रत्येकी एक संपादक - ३ सदस्य " या तरतुदीऐवजी "राज्यातील मराठी, हिंदी व इंग्रजी या वृत्तपत्रांचे संपादक/वरीष्ठ पत्रकार - ३ सदस्य " अशी तरतूद विहित करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२००९०७२९१७०२१७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(मा. आ. गुट्टे)
**अवर सचिव**, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्यातील सर्व मा. लोकसभा/राज्यसभा सदस्य,
सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य (पत्राद्वारे),
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पालक सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय सचिव, मंत्रालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, जमाबंदी,
आयुक्त, आदिवासी विकास,
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
सर्व परिक्षेत्राचे विशेष पोलीस महानिरीक्षक,
संचालक, सरकारी अभियोग संचालनालय,
संचालक, समाजिक न्याय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सदस्य सचिव, महाराष्ट्र विधी सेवा प्राधिकरण, उच्च न्यायालय मुंबई,
सह/उप सचिव तथा समन्वय अधिकारी, महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिम, महसुल विभाग, मंत्रालय,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व उप विभागीय अधिकारी (जिल्हाधिकारी यांचेमार्फत),
(यांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णयाच्या छायांकित प्रती आपल्या नियंत्रणाखालील प्रत्येक मंडळ अधिकारी, तलाठी, पोलीस पाटील यांना पोहचविण्याची व्यवस्था करावी.)
सर्व उप विभागीय पोलीस अधिकारी (पोलीस अधीक्षक यांचेमार्फत).
(यांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णयाच्या छायांकित प्रती आपल्या नियंत्रणाखालील प्रत्येक पोलीस ठाणे, प्रत्येक ग्रामपंचायत यांना पोहचविण्याची व्यवस्था करावी.)
सर्व गटविकास अधिकारी (मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांचेमार्फत).
सर्व तहसीलदार (जिल्हाधिकारी यांचेमार्फत).
निवड नस्ती (पोल-१५).